**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम.**
**विभाग़ीय संलग्नतेच्या ६६ आठवड्यांच्या**
**प्रशिक्षण कार्यक्रमासांठी मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : टिआरएन-०८१४/ प्र.क्र. ६४/१४/१८-ब
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०१४.

**वाचा** -

१. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग़ क्र. टिआरएन-२०१३/ प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.
२. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-२०१४/ प्र.क्र. ९९/१४/१२-अ, दिनांक ९.५.२०१४.
३. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग़ क्र. टिआरएन-०५१४/ प्र.क्र. १८/१८-ब, दिनांक ८.८.२०१४.

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट अ आणि गट ब मध्ये नियुक्त होणा-या विविध १९ संवर्गातील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याबाबतचा निर्णय शासनाने उपरोक्त अनुक्रमांक १ वर नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा सन २०१३ मधील शिफारसप्राप्त गट अ आणि गट ब मधील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम दिनांक ९.६.२०१४ पासून अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर येथे सुरु झालेला आहे. या परिवीक्षाधीन अधिका-यांचा **विविध विभागांमार्फत खातेनिहाय संलग्न प्रशिक्षण, जिल्हास्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार** हा ६६ आठवड्यांचा प्रशिक्षण कार्यक्रम दिनांक २४.११.२०१४ पासून संबंधित विभागांमार्फत सुरु करण्यात येणार आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी खालील मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत :-

(i) प्रत्येक परिवीक्षाधीन अधिका-याला नेमून देण्यात आलेल्या जिल्ह्याबाबतचे आदेश संबंधित विभागाने निर्गमित करुन त्याबाबत प्रशिक्षण संस्थेमार्फत (गट अ च्या बाबतीत यशदा आणि ब च्या बाबतीत वनामती, नागपूर) संबंधित परिवीक्षाधीन अधिका-याला अवगत करावे.

(ii) ज्या संवर्गाच्या परिवीक्षाधीन अधिका-यांचे विभाग़ीय प्रशिक्षण सुरु होत आहे त्या विभाग़ांनी या प्रशिक्षण कार्यक्रमाची सविस्तर माहिती असलेली पुस्तिका,प्रशासकीय विभागाच्या अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांच्या पूर्वमान्यतेने तयार करावी. ही माहिती पुस्तिका प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी किमान ८ दिवस आधी, सर्व संबंधित परिवीक्षाधीन अधिका-यांना प्रशिक्षण संस्थेमार्फत उपलब्ध करुन द्यावी. तसेच, प्रत्येक परिवीक्षाधीन अधिका-यासाठी संपर्क अधिका-याची नियुक्ती करावी.

(iii) या माहिती पुस्तिकेमध्ये मंत्रालय स्तरावरील संबंधित अधिका-याची नावे, दूरध्न्वनी, तसेच त्या विभाग़ाच्या क्षेत्रिय स्तरावरील संपर्क अधिका-यांचे नाव, पदनाम, पत्ता, दूरध्वनी इत्यादींचा समावेश असावा.

(iv) प्रशिक्षण संस्थांनी त्यांचेकडे उपलब्ध असलेले अधिकारी/ सहयोगी प्राध्यापक यांना, एखादा संवर्ग किंवा जिल्हा/विभाग, त्या संवर्गातील किंवा त्या जिल्हा/ विभागातील परिवीक्षाधीन अधिका-यांचे मूल्यमापन करण्याच्या हेतूने नेमून द्यावा.

(v) प्रशिक्षण संस्थांतील अधिकारी/ सहयोगी प्राध्यापक यांनी त्यांचेकडे नेमून देण्यात आलेल्या संवर्गातील/ जिल्हा-विभागातील परिवीक्षाधीन अधिका-यांच्या प्रशिक्षणाचे मूल्यमापन करण्यासाठी आवश्यकतेनुसार त्या-त्या ठिकाणी भेट द्यावी.

(vi) संपर्क अधिका-यांनी, परिवीक्षाधीन अधिकारी आणि प्रशिक्षण संस्थेतील (यशदा/ वनामती) अधिकारी/ सहयोगी प्राध्यापक यांच्यामध्ये समन्वय ठेवावा. प्रशिक्षण संस्थांमधील अधिकारी/ सहयोगी प्राध्यापक परिवीक्षाधीन अधिका-यांच्या मूल्यमापनासाठी आल्यावर त्यांना आवश्यक ते सर्व सहकार्य करावे.

(vii) परिवीक्षाधीन अधिकारी त्यांना नेमून दिलेली संलग्नता पुरेशा गांभीर्याने पार पाडत आहेत किंवा कसे याची खातरजमा संपर्क अधिकारी आणि प्रशिक्षण संस्थांतील अधिकारी/ सहयोगी प्राध्यापक यांनी संबंधित विभाग़/ कार्यालय प्रमुखांकडून करुन घ्यावी.

(viii) परिवीक्षाधीन अधिकारी यांनी दैनंदिन रोजनिशी दररोज न चुकता ई-मेलद्वारे संबंधित विभाग़ाचे संपर्क अधिकारी आणि प्रशिक्षण संस्थेतील संपर्क अधिकारी यांना सादर करावी.

(ix) संलग्नता देण्यात आलेल्या कार्यालयात या परिवीक्षाधीन अधिका-यांची वेळापत्रकात विहित कालावधीत मूल्यांकन चाचणी घेण्यात यावी व त्याचे निष्कर्ष विभागातील आणि प्रशिक्षण संस्थांतील संपर्क अधिका-यांना उपलब्ध करुन द्यावेत.

(xi) प्रशिक्षणार्थींच्या दैनंदिन उपस्थिती/ अनुपस्थिती/ वर्तन इ. बाबत विभागातील आणि प्रशिक्षण संस्थांतील संपर्क अधिका-यांना वेळोवेळी कार्यालय/ विभाग प्रमुखाने अवगत करावे.

(xi) प्रशिक्षणार्थींना संलग्न करण्यात आलेल्या संघटनेची रचना व कार्ये याबाबत प्रशिक्षणार्थींना झालेल्या ज्ञानाची पडताळणी करण्यासाठी दर पंधरा दिवसांनी कार्यालय प्रमुखाने मुल्यांकन चाचण्या घ्याव्यात व त्याचे निष्कर्ष विभागातील आणि प्रशिक्षण संस्थांतील संपर्क अधिका-यांना उपलब्ध करुन द्यावेत. विभागातील संपर्क अधिका-यांनी या मूल्यांकन चाचणीचा एकत्रित अहवाल विभाग़ाच्या सचिवांच्या मान्यतेने प्रशिक्षणाच्या शेवटी प्रशिक्षण संस्थेतील संपर्क अधिका-याकडे द्यावा.

(xii) प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थीने गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा घटना त्वरीत विभाग़ीय आणि प्रशिक्षण संस्थांतील संपर्क अधिका-यांच्या निदर्शनास आणून देण्यात याव्यात. तसेच, गैरवर्तनाची नोंद संबंधिताच्या वैयक्तिक सेवाभिलेखात नोंदवावे. तसेच यासंदर्भातील अहवाल संबंधित प्रशासकीय विभागाच्या सचिवांच्या मार्फत सामान्य प्रशासन विभागाकडे, कार्यवाहीच्या शिफारशीसह, सादर करण्यात यावा.

(xiii) संबंधित विभागांनी या ६६ आठवड्यांच्या अवधीमध्ये परिवीक्षाधीन अधिका-यांची विभागीय परीक्षा घ्यावी. या विभागीय परीक्षेसाठी काही अपरिहार्य कारणास्तव अनुपस्थित राहिलेल्या प्रशिक्षणार्थींना, तसेच परीक्षेत अनुत्तीर्ण होणा-या प्रशिक्षणार्थी अधिका-यांना या ६६ आठवड्यांच्या कालावधीत आणखी किमान १ संधी मिळेल, या प्रकारे विभागीय परीक्षांचे वेळापत्रक निश्चित करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१११११५५९२३३९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2014.11.11 16:07:22 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय)**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
२) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव [सामान्य प्रशासन (सेवा)/ ग्राम विकास/ सहकार/ वित्त/गृह (परिवहन)/ गृह (राज्य उत्पादन शुल्क)/ महसूल/ नगर विकास], मंत्रालय, मुंबई - ३२.
३) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
४) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर.
५) निवडनस्ती कार्यासन १८-ब.